विशेष व्याघ्र संरक्षण दलाच्या अधिकारी /
कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यांकरीता निधी.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१८/प्र.क्र.१९६/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२(६)/यो/प्र.क्र. १४५/२८४/१८-१९, दिनांक २३.०४.२०१८.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२(६)/यो/प्र.क्र. १४५/१०६२/१८-१९, दिनांक २१.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाकडील व्याघ्र प्रकल्प योजनाअंतर्गत व्याघ्र प्रकल्पाचा विकास व संरक्षण ह्या योजनेच्या अनावर्ती खर्चासाठी १००टक्के अनुदान तर आवर्ती खर्चासाठी ५० टक्के अनुदान केंद्र शासनाकडून प्राप्त होत होते. सन २०१५-१६ ह्या आर्थिक वर्षात व्याघ्र प्रकल्प ह्या योजनांच्या अनावर्ती खर्चासाठी पहिला हप्ता १०० % केंद्र हिस्सा ह्या पध्दतीप्रमाणेच वितरीत झाला होताव आवर्ती खर्चासाठी ५० % केंद्र हिस्सा प्राप्त झाला होता व त्या अनुषंगाने ५० % राज्य हिस्सा वन्यपशु व्यवस्थापन आणि संरक्षण २४०६ २३८४ ह्या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत केला जात होता.

२. दरम्यानच्या काळात केंद्रीय पर्यावरण, वन व हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दिनांक १८.१२.२०१५ च्या पत्रान्वये 'व्याघ्र प्रकल्प' योजनाअंतर्गत अनावर्ती खर्चाचा १०० टक्के केंद्र हिस्सा अंतर्गत हिस्सा पद्धती ६०:४० अशी बदलली असल्याबाबत सूचित करण्यात आले आहे. सुधारीत हिस्सा पध्दतीनुसार आगामी काळात 'व्याघ्र प्रकल्प' योजनाअंतर्गत केंद्र शासनाने अनावर्ती खर्चाच्या कार्यबाबींकरीता ६०% केंद्र हिस्सा व त्यास अनुरुप ४० % राज्य हिस्सानुसार निधी वितरीत करणे अपेक्षित आहे

३. सुधारीत निधी हिस्सा पध्दतीनुसार राज्य शासनास ४० % भार उचलावा लागणार आहे, त्यामुळे विशेष व्याघ्र संरक्षण दलात कार्यरत असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वेतनाचा ४० % भार उचलण्याची जबाबदारी ही राज्य शासनाचीदेखील आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकानुसार " सन २०१८-१९ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१८ अखरे) आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत सदर प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत केला जाईल.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, पेंच व्याघ्र प्रकल्प, मेळघाट व्याघ्र प्रकल्प व नवेगाव नागझिरा व्याघ्र प्रकल्पाअंतर्गत कार्यरत असलेल्या विशेष व्याघ्र संरक्षण दलाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे एप्रिल ते जूलै २०१८ पर्यंतच्या वेतन व भत्त्याकरीता आवश्यक

असलेला निधी राज्य शासनाच्या ४०% हिश्शापोटी भागविण्यास सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१८-१९ मध्ये लेखाशीर्ष क्रमांक लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए १०२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावी.
२. वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने व राज्य शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.
३. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.
४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौसं.क्र. विवि/ शिकाना/ २७८, दिनांक :- १३.०७.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०२१६०१०३७५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.08.02 16:03:21 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.

५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा - अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
८. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
९. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
१०.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

************